सहायक (मुख्य) परीक्षा - २०१२ – दि. ९ सप्टेंबर २०१२



2012

Code : **D01**

प्रश्नपुस्तिका क्रमांक
**BOOKLET No.** 101729

**प्रश्नपुस्तिका**
**मराठी व इंग्रजी**

वेळ : 2 (दोन) तास

एकूण प्रश्न : 200
एकूण गुण : 200

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 200 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत,याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

परीक्षा-क्रमांक

केंद्राची संकेताक्षरे — शेवटचा अंक

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

SEAL

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/ किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**





1. खालीलपैकी अचूक शब्द निवडा

(1) पारंपारिक (2) परंपारिक (3) पारंपरिक (4) पारंपरीक

2. 'शुभ-पवित्र-शिव' म्हणजे

(1) मंगल (2) चांगले (3) प्रेयस (4) चांगल

3. धारवाडी काटा म्हणजे

(1) धारवाडहून आणलेला वजन काटा
(2) पायात बोचलेला विशिष्ट काटा
(3) बिनचूक वजनाचा काटा
(4) कान टोचण्याचे एक साधन

4. 'जे खळांची व्यंकटी सांडो' यातील अधोरेखित खळ शब्दाचा अर्थ काय ?

(1) खलबल (2) धोरण (3) खड्डा (4) दुर्जन

5. पुढीलपैकी परदेशी शब्द कोणते ?

(1) गुडगा, लुगडे, ढेकूण
(2) परंतु, विनंती, काळजी
(3) टेबल, बटाटा, पोशाख
(4) कळस, किळस, आळस

6. 'भंग' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द सांगा

(1) भग्न (2) निर्भंग (3) सभंग (4) अभंग

7. 'लिहिण्याची हातोटी' या शब्दसमूहासाठी योग्य पर्याय निवडा

(1) व्यक्तिगतशैली (2) लेखनकला (3) लेखनशैली (4) लेखनविषय

8. 'हलकी वाहने डाव्या बाजूने न्या' अधोरेखित शब्दाचा विरुद्धार्थी शब्द कोणता ?

(1) फुलकी
(2) अवजड
(3) जडशील
(4) जडशीर

9. 'अजर' म्हणजे

(1) ज्याला कधीही मरण येत नाही तो
(2) अजगराप्रमाणे सुस्त पडणारा
(3) ज्याला कधीही म्हातारपण येत नाही असा
(4) म्हातारपण लांबविणारे औषध

10. 'आवक' या शब्दाला विरुद्धार्थी शब्द सांगा

(1) श्रावक (2) भावक (3) जावक (4) वाहक

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

 

**11.** खालीलपैकी अयोग्य पर्याय निवडा

(1) शुक्लपक्ष = वद्य पक्ष (2) सधवा=पती हयात असलेली स्त्री

(3) मनकवडा = मनातील ओळखणारा (4) विधुर = पत्नी हयात नसणारा

---

**12.** 'सांगोपांग' या शब्दातून नेमकेपणाने व्यक्त होणारा अर्थ काय ?

(1) यथासांग (2) सांगयथा (3) सांगकथा (4) तुटकतुटक

---

**13.** योग्य शब्द निवडा

(1) अल्पसंख्याक (2) अल्पसंख्यांक (3) अल्पसख्यांक (4) अप्लसंख्यांक

---

**14.** श्रीमंत माणसे <u>अतिशय चैनबाजी</u> करतात या वाक्यातील अधोरेखित वाक्यखंडासाठी अचूक शब्द निवडा

(1) वारेमाप खर्च करणे (2) पैसा उधळणे

(3) जिवाची मुंबई (4) मुंबईचा जीव

---

**15.** अली, मधुप, मिलिंद म्हणजे

(1) डोंगर (2) भ्रमर (3) मकरंद (4) मधमाशी

---

**16.** 'घड्याळाने पाच वाजल्याचे दर्शविले' या वाक्यातील शब्दशक्ती ओळखा

(1) अभिधा (2) लक्षणा (3) लाक्षणिक (4) व्यंजना

---

**17.** पतिपत्नीस एकत्र जेवावयास बोलावले तर त्यांस ________ म्हणतात.

(1) युगल (2) मेहूण (3) नरमादी (4) स्त्री–पुरुष

---

**18.** खालीलपैकी सिद्ध शब्द ओळखा

(1) येऊन (2) ये (3) येओ (4) येणार

---

**19.** खालील शब्दांतून वस्त्र व आकाश अर्थ असलेला शब्द निवडा

(1) नभ (2) गगन् (3) पट (4) अंबर

---

**20.** कवि, मधु, गुरु, पुत्र, कन्या हे शब्द कोणत्या प्रकारातील आहेत ?

(1) तत्सम (2) तद्भव (3) फारशी (4) अरबी

---

**21.** 'प्रार्थना' हा शब्द कोणत्या प्रकारात मोडतो ?

(1) उपसर्गघटित (2) प्रत्ययघटित (3) सिद्ध (4) सामासिक

---

**22.** खालीलपैकी ‘देशी’ शब्द ओळखा

(1) लुगडे (2) आटा (3) बटाटा (4) खाना

**23.** अभ्यस्त शब्द म्हणजे

(1) सामासिक शब्द (2) तद्भव शब्द (3) द्विरुक्त शब्द (4) तत्सम शब्द

**24.** खालीलपैकी कोणता शब्द इंग्रजी भाषेतून आला आहे ?

(1) पार्सल (2) मार्शल (3) बटाटा (4) तंबाखू

**25.** ज्या समासात द्वितीय पद प्रधान असते त्याला ________ समास म्हणतात.

(1) द्वन्द्व समास (2) कर्मधारय समास (3) तत्पुरुष समास (4) यापेक्षा वेगळे उत्तर

**26.** ‘मेहनत’ हा शब्द कोणत्या भाषेतून मराठीत आला आहे ?

(1) अरबी (2) फारशी (3) इंग्रजी (4) संस्कृत

**27.** खालील शब्दांतील धातुसाधित नसलेला शब्द ओळखा

(1) विणकर (2) टाकाऊ (3) चिडखोर (4) कर्जाऊ

**28.** ‘जमाव’ या शब्दातील ‘ज’ हा वर्ण कोणत्या प्रकारचा आहे ?

(1) तालव्य (2) मूर्धन्य (3) दंततालव्य (4) कंठतालव्य

**29.** खालील शब्दांतील अभ्यस्त नसलेला शब्द ओळखा

(1) जिकडेतिकडे (2) आंबटचिंबट (3) किरकीर (4) दगडबिगड

**30.** खालीलपैकी ‘कंठ्यवर्ण’ कोणता ?

(1) छ् (2) अ (3) ङ् (4) र्

**31.** शब्द उच्चारल्याबरोबर विशिष्ट वस्तू-पदार्थ डोळ्यासमोर येतो. ती शब्दशक्ती म्हणजे

(1) लक्षणा (2) व्यंजना (3) निरूढा (4) अभिधा

**32.** खालीलपैकी ‘मूर्धन्य वर्ण’ कोणता ?

(1) छ (2) ब (3) क (4) ढ्

**33.** जोडअक्षर म्हणजे काय ? किंवा जोडाक्षराचे समीकरण लिहा। किंवा जोडाक्षर म्हणजे

(1) दोन किंवा अधिक व्यंजने + स्वर (2) अक्षर + अक्षर

(3) स्वर + व्यंजन (4) व्यंजन + व्यंजन

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**



**34.** ‘क्षुध + पीडा’ याची योग्य संधी कोणती ?

(1) क्षुत्पीडा (2) क्षुतपीडा (3) क्षुत्पिडा (4) क्षुत्पिडा

**35.** ‘ए’ हा स्वर कोणत्या प्रकारात मोडतो ?

(1) विजातीय स्वर (2) संयुक्त स्वर (3) दीर्घ स्वर (4) व्यंजनयुक्त स्वर

**36.** ‘जगज्जननी’ या शब्दाचा योग्य विग्रह कोणता ?

(1) जगज्ज + ननी (2) जग + अननी (3) जगत् + जननी (4) जग + जननी

**37.** ‘जनाबाई’ या शब्दातील ‘ज’ चा उच्चार ________ आहे.

(1) दन्तमूलीय (2) तालव्य (3) दन्त्य (4) मूर्धन्य

**38.** लिपीचा शोध लागल्याने आपल्याला काय शक्य झाले आहे ?

(1) वाचन (2) लेखन (3) मनन (4) चिंतन

**39.** दिक् + पाल = दिक्पाल हा संधीप्रकार कोणता ?

(1) व्यंजनसंधी (2) स्वरसंधी (3) अनुनासिक संधी (4) विसर्ग संधी

**40.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात ओळखा

“नुसती हुशारी काय कामाची ?”

(1) विशेषण (2) गुणधर्मदर्शक भाववाचक नाम

(3) सामान्य नाम (4) विशेष नाम

**41.** देवनागरी लिपी असणाऱ्या भाषा कोणत्या ?

(1) मराठी, गुजराथी, हिंदी, संस्कृत

(2) मराठी, हिंदी, इंग्रजी, कानडी

(3) मराठी, तेलगू, हिंदी, संस्कृत

(4) मराठी, कानडी, गुजराथी, बंगाली

**42.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात ओळखा

‘वानर’ वडावर चढले.

(1) भाववाचक (2) विशेषनाम (3) सामान्यनाम (4) धातुसाधित नाम

**43.** विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागताना नामाचे सर्वनामाचे जे रूप बदलते त्याला ________ म्हणतात.

(1) विशेष रूप (2) प्रकृतिरूप (3) सामान्यरूप (4) विभक्तिरूप

---

**44.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात ओळखा

'कुठे आहे तो भामटा ? तो बघा पळाला'

(1) दर्शक सर्वनाम (2) संबंध सर्वनाम

(3) आत्मवाचक सर्वनाम (4) सामान्य सर्वनाम

---

**45.** योग्य विधान निवडा

(1) विशेषण हे विशेष्याच्या लिंग, वचनाप्रमाणे बदलते.

(2) विशेषण हे अविकारी आहे.

(3) विशेषण हे अव्यय आहे.

(4) क्रियाविशेषण हे नामाला लागते.

---

**46.** 'लुच्चेगिरी' या शब्दाचे लिंग कोणते ?

(1) नपुंसकलिंगी (2) उभयलिंगी (3) स्त्रीलिंगी (4) पुल्लींगी

---

**47.** खालील शब्दांपैकी ________ हे भाववाचक नाव नाही.

(1) शांत (2) नवलाई (3) समता (4) धैर्य

---

**48.** 'गाय' या शब्दाचे इकारान्त अनेकवचन लिहा

(1) गाया (2) गायी (3) गाई (4) गाए

---

**49.** स्वार्थापोटी सत्कार्यालाही माणसे विरोध करतात. यात अधोरेखित ही हे ________ आहे.

(1) सर्वनाम (2) उभयान्वयी अव्यय

(3) शब्दयोगी अव्यय (4) प्रत्यय

---

**50.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दांचा विशेषण प्रकार ओळखा

तिला बनारसी साडी शोभून दिसते.

(1) नामसाधित विशेषण (2) सार्वनामीक विशेषण

(3) समासघटित विशेषण (4) संबंधी विशेषण

---

**51.** क्रियापद म्हणजे ________

(1) केवळ क्रियादर्शक शब्द (2) क्रियेबद्दल माहिती सांगणारा शब्द

(3) क्रिया संपविणारा शब्द (4) वाक्य पूर्ण करणारा क्रियावाचक शब्द

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

 

**52.** अधोरेखित शब्दाचा विशेषणाचा प्रकार ओळखा 'राम <u>एकवचनी</u> राजा होता'.

(1) नामसाधित विशेषण
(2) गुणविशेषण
(3) सर्वनामिक विशेषण
(4) समासघटित विशेषण

**53.** 'झाड पाडले' या वाक्यात 'पाडले' या क्रियापदाचा प्रकार ओळखा.

(1) संयुक्त क्रियापद
(2) प्रयोजक क्रियापद
(3) अनियमित क्रियापद
(4) शक्य क्रियापद

**54.** 'वादळात झाड सापडले' या वाक्यातील क्रियापदाचा प्रकार सांगा.

(1) अकर्मक क्रियापद
(2) सकर्मक क्रियापद
(3) अकर्व्हक क्रियापद
(4) सहाय्यक क्रियापद

**55.** 'सुरेश गीत गात होता' काळ ओळखा

(1) पूर्ण भूतकाळ (2) अपूर्ण भूतकाळ (3) चालू भूतकाळ (4) सामान्य भूतकाळ

**56.** 'मी निबंध लिहितो' अपूर्ण भविष्यकाळ करा.

(1) मी निबंध लिहिण
(2) मी निबंध लिहित जाईन
(3) मी निबंध लिहित असेन
(4) वरील एकही पर्याय योग्य नाही

**57.** अचूक वाक्य ओळखा

(1) सर्वच क्रियाविशेषणे अव्यय असतात
(2) कांही क्रियाविशेषणे विकारीही असतात
(3) क्रियाविशेषणे ही एकाक्षरी नसतात
(4) क्रियाविशेषणे ही क्रियेच्या कर्त्याविषयी माहिती देतात

**58.** खालील वाक्यातील विशेषणांचा प्रकार ओळखा.
'माझा आनंद द्विगुणीत झाला'.

(1) पृथकत्ववाचक संख्याविशेषण
(2) अनिश्चित संख्याविशेषण
(3) आवृत्तीवाचक संख्याविशेषण
(4) सार्वनामिक विशेषण

**59.** कोणते शब्दयोगी अव्यय लावताना शब्दाचे सामान्यरूप होत नाही ?

(1) मुळे (2) पैकी (3) मध्ये (4) च्

**60.** 'पाऊस <u>सगळीकडे</u> पडला बर का' अधोरेखित क्रियाविशेषणाचा प्रकार सांगा.

(1) कालवाचक क्रियाविशेषण अव्यय
(2) रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय
(3) स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय
(4) परिणामदर्शक क्रियाविशेषण अव्यय

**61.** मधूला गोरी <u>नि</u> शिकलेली वधू पाहिजे या वाक्यातील '<u>नि</u>' हे अव्यय कोणते ?

(1) विकल्प बोधक (2) समुच्चय बोधक (3) परिणाम बोधक (4) न्यूनत्व बोधक

---

**62.** खालील अधोरेखित शब्दाचा क्रियाविशेषण अव्ययाचा प्रकार ओळखा.

' पाणी <u>गटागटा</u> पिऊ नकोस'

(1) परिणाम दर्शक क्रियाविशेषण अव्यय (2) कालवाचक क्रियाविशेषण अव्यय

(3) स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय (4) रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय

---

**63.** शुद्धलेखन नियमांनुसार शुद्ध शब्द निवडा

(1) मंदीर (2) अनील (3) कीडा (4) गुण

---

**64.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात ओळखा.

'<u>घरापुढे</u> मोठे अंगण आहे ?

(1) उभयान्वयी अव्यय (2) केवलप्रयोगी अव्यय

(3) शब्दयोगी अव्यय (4) क्रियाविशेषण अव्यय

---

**65.** आमच्या संघाने स्पर्धा जिंकली. या वाक्यात विधेय कोणते ?

(1) स्पर्धा जिंकली (2) आमच्या संघाने

(3) स्पर्धा (4) जिंकली

---

**66.** वर, खाली, समोर हे कोणत्या जातीचे शब्द आहेत ?

(1) उभयान्वयी अव्यय (2) क्रियाविशेषण अव्यय

(3) केवलप्रयोगी अव्यय (4) शब्दयोगी अव्यय

---

**67.** व, पण, किंवा आणि या अव्ययांनी जोडलेले वाक्य हे __________ असते.

(1) मिश्र वाक्य (2) केवलवाक्य (3) संयुक्त वाक्य (4) गौणवाक्य

---

**68.** खालील वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात कोणती ?

'तुला पन्नास रुपये दिले, <u>आणखी</u> काय देऊ ?'

(1) विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय (2) समुच्चय बोधक उभयान्वयी अव्यय

(3) प्रधानसूचक उभयान्वयी अव्यय (4) परिणामबोधक उभयान्वयी अव्यय

---

**69.** जर चांगला अभ्यास केला तर उत्तम यश मिळेल हा __________ वाक्य प्रकार आहे.

(1) मिश्र वाक्य (2) संकेतार्थी वाक्य

(3) आज्ञार्थी (4) विध्यर्थ

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

 

**70.** खालील वाक्यातील उभयान्वयी अव्ययाचा प्रकार ओळखा.
'गडी-माणसांचीच तेवढी अडचण आहे, बाकी सर्व ठीक आहे.'
(1) न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्यय (2) परिणामबोधक उभयान्वयी अव्यय
(3) कारणदर्शक उभयान्वयी अव्यय (4) संकेतदर्शक उभयान्वयी अव्यय

**71.** योग्य जोडी निवडा
(1) उद्देश्य = कर्म (2) उद्देश्य = क्रियापद (3) उद्देश्य = कर्ता (4) उद्देश्य = विधेय

**72.** ' आम्ही हाच साबण वापरतो. कारण की तो स्वदेशी आहे'. अधोरेखित शब्दाचा अव्यय प्रकार सांगा.
(1) न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्यय (2) परिणामबोधक उभयान्वयी अव्यय
(3) कारणदर्शक उभयान्वयी अव्यय (4) स्वरूपबोधक उभयान्वयी अव्यय

**73.** 'वाईट काम करू नका' या वाक्याचे होकारार्थी वाक्य बनवा
(1) चांगले काम करा (2) वाईट काम करा
(3) चांगले काम करू नका (4) यापैकी नाही

**74.** 'वाघ' या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप ओळखा
(1) वाघिण (2) वाघिन (3) वाघ्रीन (4) वाघीण

**75.** अगोदर स्त्रियांना आत जाऊ द्यावे. हे वाक्य
(1) विधानार्थी आहे (2) आज्ञार्थी आहे (3) इच्छार्थक आहे (4) मिश्रवाक्य आहे

**76.** 'सुतार' या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप ओळखा
(1) भ्रतार (2) सुतारीण (3) लोहार (4) होलार

**77.** वाक्य पृथक्करण म्हणजे
(1) वाक्यातील शब्दांचा परस्पर संबंध स्पष्ट उलगडणे
(2) दोन वाक्य वेगवेगळी करणे
(3) दोन वाक्य एकमेकांना जोडणे
(4) वाक्य शुद्ध करून लिहिणे

**78.** 'वानर' या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप ओळखा
(1) माकड (2) वानरी (3) माकडीण (4) बोका

**79.** 'फळे गोड निघाली' या वाक्यातील विधेय पूरक ओळखा
(1) फळे (2) गोड फळे (3) गोड (4) निघाली

**80.** खालील वाक्यातील प्रयोग ओळखा

'मांजराकडून उंदीर मारला गेला'

(1) प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग
(2) भावे प्रयोग
(3) कर्मणि प्रयोग
(4) कर्तरी प्रयोग

---

**81.** मुसळधार पाऊस पडला – उद्देश्यविस्तार ओळखा

(1) मुसळधार (2) पाऊस (3) पडला (4) पाऊस पडला

---

**82.** खालील वाक्यातील प्रयोग ओळखा

'सहलीस जाताना कात्रजजवळ उजाडले.'

(1) कर्मभाव संकर प्रयोग
(2) मिश्र किंवा संकर प्रयोग
(3) भावकर्तरि प्रयोग
(4) कर्म-कर्तृ प्रयोग

---

**83.** सुरेशने सुरेल गाणे म्हटले – कर्मविस्तार सांगा

(1) म्हटले (2) गाणे (3) सुरेल (4) सुरेश

---

**84.** दोन शब्द जोडताना कोणते विरामचिन्ह वापरतात ?

(1) योग्य चिन्ह (2) संयोग चिन्ह (3) योग चिन्ह (4) अर्ध विराम

---

**85.** वेदश्री चित्रे काढीत आहे – काळ ओळखा.

(1) अपूर्ण वर्तमान काळ
(2) पूर्ण वर्तमान काळ
(3) रीती वर्तमान काळ
(4) उद्देश्य वर्तमान काळ

---

**86.** खालील वाक्यामध्ये योग्य उद्‌गार चिन्ह वापरलेले वाक्य कोणते ?

(1) आहेत छान किती फुले !
(2) फुले किती छान आहेत !
(3) छान ! किती फुले आहेत !
(4) अय्या ! किती छान फुले आहेत !

---

**87.** वाक्य संश्लेषन म्हणजे

(1) वाक्य पृथक्करण
(2) वाक्य अन्वेषण
(3) वाक्य संयोजन
(4) वाक्यानुसंधान

---

**88.** ''न्यायाधिशाकडून दंड करण्यात आला'' या प्रयोगाचे नाव सांगा.

(1) कर्तरी प्रयोग
(2) भावे प्रयोग
(3) समापन कर्मणी प्रयोग
(4) नवीन कर्मणी प्रयोग

---

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**

 

**89.** एकाने माणसे मोजून पाहिली ती नऊच भरली – संयुक्त वाक्य करा
(1) एकाने माणसे मोजून पाहिली पण ती नऊच भरली
(2) एकाने माणसे मोजून पाहिल्याबरोबर ती नऊच भरली
(3) नऊ माणसे भरल्यामुळेच ती एकाने मोजून पाहिली
(4) एकाने माणसे मोजली आणि ती नऊच भरली

---

**90.** खालीलपैकी शुद्ध शब्द ओळखा
(1) बलिष्ट (2) बलीष्ट (3) बलिष्ठ (4) भलिष्ट

---

**91.** चुकीचा अर्थ असलेला वाक्प्रचार निवडा
(1) निगराणी करणे = काळजी करणे
(2) भ्रमनिरास होणे = वास्तवाची कल्पना येणे
(3) डोळे लावून बसणे = डोळे मिटवून बसणे
(4) मंत्रमुग्ध होणे = भारावून जाणे

---

**92.** 'पण मन बेटे स्वस्थ राहिना' या वाक्यातील अधोरेखित 'बेटे' या शब्दातील उद्‌गारवाची अव्ययाचा प्रकार सांगा
(1) व्यर्थउद्‌गारवाची (2) संमती वाचक (3) संबोधन दर्शक (4) हर्षदर्शक

---

**93.** 'बोल लावणे' या वाक्प्रचाराचा अचूक अर्थ लिहा
(1) अंगास लावणे (2) दोष देणे
(3) बोलास बोल लावणे (4) बोलून भांडण लावणे

---

**94.** मुख्य वाक्यास दुसरे पर्यायी नांव काय ?
(1) प्रमुख (2) प्रधान (3) गौण (4) अगौण

---

**95.** दिलेल्या वाक्समूहातून म्हण शोधा
(1) सापाला दूध पाजणे (2) जिभेला हाड नसणे
(3) वरातीमागून घोडे (4) धारातीर्थी पडणे

---

**96.** मला ताप आला आहे, मी शाळेस येणार नाही. (केवल वाक्य करा)
(1) ताप आला शाळेस कशाला जाऊ ?
(2) मला ताप आल्यामुळे मी शाळेस जाणार नाही.
(3) मला ताप आल्यामुळे शाळेस जाणे बरे नव्हे.
(4) शाळेला जाणार नाही कारण ताप आला आहे.

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**97.** ‘कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ’ म्हणजे

(1) आपल्या माणसांच्या नाशास आपणच कारण

(2) कुऱ्हाडीचा दांडा काळा असावा

(3) पैसा असेपर्यंतच लोक मान देतात

(4) यापैकी नाही

---

**98.** नामवाक्य, विशेषणवाक्य, क्रियाविशेषण वाक्य हे कोणत्या वाक्याचे प्रकार आहेत ?

(1) गौण वाक्याचे (2) प्रधान वाक्याचे

(3) विशेषण वाक्याचे (4) नाम वाक्याचे

---

**99.** सांबाच्या पिंडीते बससी अधिष्ठूनि वृश्चिका आज ।

तो आश्रय तुटता खेटर उतरील तुझा माज ।।

यांतून प्रगट होणारी म्हण –

(1) विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर

(2) तुका म्हणे विंचवाची नांगी ।
तैसा दुर्जन सर्वांगी ।।

(3) लेकी बोले सुने लागे

(4) गुरुची विद्या गुरुला

---

**100.** ‘तो नेहमीच लवकर येतो’ या वाक्यातील काळ ओळखा

(1) वर्तमान काळ (2) अपूर्ण वर्तमान काळ

(3) पूर्ण वर्तमान काळ (4) रीतिवर्तमान काळ

---

**101.** घर फिरले म्हणजे घराचे वासेही फिरतात. ही म्हण ________ इथे उपयुक्त आहे.

(1) राजूची नोकरी गेल्यामुळे त्याच्याशी कोणीही नीट वागत नव्हते

(2) राजूने त्याच्या घराची दिशा बदलली

(3) घोर संकट आले की थोडीशी मदतही महत्त्वाची ठरते

(4) यापैकी नाही

---

**102.** ‘काम न करता परत येणे’ या अर्थाचा वाक्प्रचार कोणता ?

(1) हात मारणे (2) हातावर पोटमारणे

(3) हातीपायी सुटणे (4) हात टालवित परत येणे

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK



**103.** कृष्णाचे वडील आजारी पडले, त्यातच
त्याच्या आईचा पाय मोडला म्हणतात ना!

(1) आई जेवू घालीना अन् बाप् भीक मागू देईना
(2) इकडे आड तिकडे विहीर
(3) दुष्काळात् तेरावा महिना
(4) घरचे झाले थोडे अन् व्याह्याने धाडले घोडे

**104.** 'जीवाचे रान करणे' समानार्थी वाक्प्रचार सांगा.

(1) हाडाची काडे करणे
(2) हाड शिजविणे
(3) हाड मोडून पडणे
(4) हाडाचे पाणी करणे

**105.** नाविक शब्दाचा विग्रह करा

(1) नौ + इक = नाविक
(2) ना + विक = नाविक
(3) नाव + इक = नाविक
(4) नावी + क = नाविक

**106.** 'नाकी नऊ येणे' या वाक्प्रचाराचा योग्य उपयोगासाठी खालील पर्यायातून अचूक वाक्य लिहा.

(1) आवडता पदार्थ मिळाल्यावर नाकी नऊ येतात
(2) रात्र आठवल्यावर नाकी नऊ येते
(3) लाईट गेल्यावर नाकासमोर बघून चालणे
(4) कर्जबाजारी झाल्याने संपतरावाच्या नाकी नऊ आले

**107.** कोणत्याही क्षेत्रात हळूहळू होणारा बदल म्हणजे.

(1) क्रांती (2) परिवर्तन (3) परावर्तन (4) उत्क्रांती

**108.** 'ज्या माणसांजवळ विद्वता बेताचीच असते तो खूप बढाया मारताना आढळतो.पण ज्याच्याजवळ सखोल ज्ञान असते तो शांत असतो'.
यासाठी योग्य अर्थाची म्हण सांगा.

(1) असंत कणंबर पण बढाया मारणे
(2) विद्वान सर्वच पूज्यते
(3) विद्वानाला बढाया माराव्याच लागतात
(4) उथळ पाण्याला खळखळाट फार

**109.** शेवटी ती वेल वाळून गेली. हे उदाहरण ____________ प्रयोगाचे आहे.

(1) कर्मणी (2) कर्तरी (3) भावे (4) सकर्मक कर्मणी

**110.** 'क्षुद्र माणसे क्षुद्र वस्तूंना भाळतात' या वाक्यासाठी योग्य अर्थाची म्हण लिहा

(1) हलक्या माणसांना कसे वागावे कळत नाही
(2) कोल्हा काकडीला राजी
(3) क्षुद्र म्हणजे पैसे देवून वस्तू घेवू शकत नाहीत
(4) क्षुद्रांना वस्तू फार प्रिय असतात

**Q. No. 111 ते 115 :**

'संस्कृति' म्हणजे त्या त्या देशाची, त्या मानव समूहाची, समाजपुरुषाची खरी "संपन्नता" होय. हर एक देशांत एक 'सद्गुणसमूह' असतो. तो 'सद्गुण-समूह' च त्या देशाची 'संस्कृति' बनवीत असतो. त्या संस्कृती' प्रमाणें त्या त्या देशवासीयांची जडण-घडण होऊन तीच त्यांची 'अस्मिता' जागृत राहते, अर्थात् त्यारूपानें 'स्वदेशाभिमान' जागृत राहात असतो. यांतील भाव असा कीं, सत्संस्कारमूलक-चांगल्यासंस्कारपूर्वक ज्या ज्या 'सत्कृति' चांगल्या कृति, सात्त्विक कृति झाल्या, त्या त्या सत्-कृतीवद्दल त्या त्या आजूबाजूंच्या मानवसमाजाच्या मनीं – मानसीं आदरभाव निर्माण होतो. त्यांतूनच हळूहळू विशिष्ट अशी 'संस्कृति' बनत असते. किंबहुना ! ती 'संस्कृति' हेंच त्या देशाचें 'भूषण-स्थान' होय. केवळ उत्तुंग इमारतींचे, रमणीय उपवनांचे महावनांचे, सुशीतल मोठ्या जलाशयाचे वा विस्तीर्ण अशा भूभागाचे 'रक्षण' म्हणजे 'स्वदेशरक्षण', असें मुळींच नव्हें; तर उपर्युक्त स्वरूपाच्या 'संस्कृती' चे रक्षण म्हणजे खरे व उचित देशाचे रक्षण होय; समाजपुरुषाचे, लोकसंस्थेचे रक्षण होय. किंबहुना ! आपल्या संस्कृतीच्या, मानवी-अस्मितेच्या, मानवी 'जीवनमूल्यांच्या' रक्षणार्थच देशाचे व देशांतील इतर निसर्गदत्त व स्वोपार्जित सर्वपदार्थांचे, भोगसमृद्धीचे रक्षण करावे लागते, म्हणजेच मानव समाजांत सद्गुण समूह, जीवनमूल्यें हीं नांदतात आणि त्यामुळें मानवाचे-मानव समूहाचे जीवन बेरंग, बेचैन आणि दुखरे बनत नाहीं.

---

**111.** संस्कृती म्हणजे

(1) अस्मिता
(2) चांगल्या गुणांचा संचय
(3) देशांतील सर्व बरे वाईट संस्कार
(4) देशातील रीतिरिवाज

---

**112.** देशरक्षण म्हणजे

(1) देशातील भोगसमृद्धीचे रक्षण
(2) चतु:सीमा संरक्षित करणे
(3) परकीय शक्तींचा बिमोड करणे
(4) देशातील सद्गुण समूहाचे रक्षण

---

**113.** लेखकाच्या मतानुसार अस्मिता म्हणजे

(1) देशातील उत्तुंग इमारती, उपवने इ.
(2) स्वदेश संस्कृती अभिमान
(3) देशातील जलाशये
(4) देश ध्वज

---

**114.** मानवाचे जीवन दुखरे, बेरंग, बेचैन कशामुळे बनते ?

(1) असद्गुण समूहामुळे
(2) जीवनमूल्यामुळे
(3) संस्कृती व जीवनमूल्यांच्या अभावात
(4) भोगसमृद्धी, रमणीय उपवने कमी झाल्यास

---

**115.** सदर उताऱ्यास योग्य शीर्षक द्या

(1) जीवनमूल्य
(2) सांस्कृतिक संचित
(3) संस्कृति रक्षण
(4) संस्कृतीसमन्वय

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

 

पुढील उत्तारा वाचून त्या खालील प्रश्न क्र. **116 ते 120** ची उत्तरे लिहा :

या देशाचें प्राचीन संस्कृत नांव आर्यावर्त किंवा भरतखंड असें आहे. परंतु तार्तर देशांतून जे मोंगल मुसलमान लोक जिंकण्याकरितां हिंदुस्थानांत शिरले होते, त्यांस हे लोक काळे असें भासलें म्हणून त्यांनी तद्वाचक हिंदु असें नांव त्यास दिलें व त्यामुळें हिंदुस्थान हेंही नांव या देशाचें त्यांनींच ठेविलें. त्याचाच भावार्थ पुढें काळे लोक काळी पलटण असा झाला.

युरोपखंडांत किती एक राज्यें व संस्थानें आहेत; आणि हा एकटा हिंदुस्थान देशच अर्ध्या युरोपखंडाएवढा आहे. म्हणून या देशास एक देश आहे म्हणणें वास्तविक पाहिलें तर योग्य नाहीं. कारण कीं, हें खरेंच एक मोठें खंड आहे व त्यांत अनेक देश आहेत. एकंदर प्रजा यांत 20 कोटी आहे व विलायतेंत सारी दोन कोटी प्रजा आहे. तेणेंकरून विलायतेचे दसपट हा देश मोठा आहे. आतां विलायतेची वसाहत जरी फार दाट आहे, तरी हिंदुस्थानची लांबीरुंदी 15/16 पट त्यापेक्षां अधिक येईल. या देशांत जिकडे तिकडे ब्राम्हणांचा अधिकार, संस्कृत भाषा व धर्म एकसारखा आहे, इतकेंच काय तें ऐक्यतेचें चिन्ह आहे. परंतु तसा युरोपखंडांतही सर्वत्र एकच धर्म चालतो. तथापि देश व राज्यें पृथक मानिलीं जातात व युरोपांतील लोक मोठे पराक्रमी आहेत. अस्तु.

हिंदुस्थानचे दक्षिण भागास चार भाषा आहेत. कानडी, मलबारी, तैलंगी आणि द्राविडी. यांपैकी द्राविडीस 'तामळ' किंवा 'आरवी' असेंही म्हणतात. या चारी भाषा एका पद्धतीच्या आहेत. यांमध्यें व मध्य हिंदुस्थानचे भाषेंत एक मोठा भेद असा आहे कीं, मनुष्यजातीखेरीज सर्व पदार्थ नपुंसक लिंगांत जातात. घोडा, घोडी; बैल, गाय यांचा भेद नाहीं. मनुष्याव्यतिरिक्त बाकी जिवांस त्या भाषांत एकच नपुंसक लिंग समजतात. या चार भाषा सोडून मध्य हिंदुस्थानांत किंवा दक्षिणेकडे आलें म्हणजे तेथें सहा भाषा एकाच तऱ्हेच्या आढळतात. 1 मराठी, 2 गुजराथी, 3 मेवाडी, 4 मारवाडी, 5 कच्छी, व 6 सिंदी. नंतर पूर्वेस फिरलें म्हणजे 1 माळवी, 2 रांगडी, 3 ब्रिज, 4 मुलतानी, 5 काश्मिरी व 6 पंजाबी; आणि याचेही पूर्वेस वळल्यावर 1 हिंदी, 2 बंगाली, 3 उडियी, आणि 4 नेपाळी अशा 4 आहेत. या सर्व पूर्वेच्या भाषा एकसारख्या पद्धतीच्या व एकमेकींस जवळजवळ आहेत. एकूण 20 भाषा झाल्या. आतां या सर्व भाषा बोलणारे लोक पाहिले तर वेगळ्या स्वभावाचे व वेगळ्या पोषाकाचे आणि वेगवेगळे रीतिभातीचे आहेत. या वीसही जातींचे लोकांत चांगले लोक ब्रिज भाषा बोलणारे हे आहेत. हे स्वरूपानें, स्वाभाविक गुणानें व शौर्यानेंही फार चांगले आहेत व इंग्रजी पलटणींत जे बहुतकरून लोक असतात, ते याच प्रदेशांतील. यांचे मनामध्यें कपट नसून मित्रभाव चांगला असतो व प्रसंगीं हे आपले जिवाकडेही पाहावयाचे नाहींत, असे हे खरे क्षत्रिय लोक आहेत.

**116.** हिंदुस्थानचे प्राचीन संस्कृत नांव काय आहे ?

(1) भरत
(2) हिंदुस्थान
(3) दर्यावर्त भूभाग
(4) आर्यावर्त किंवा भरतखंड

कच्च्या कामासाठी जागा/**SPACE FOR ROUGH WORK**

**117.** हिंदुस्थान देश केवढा आहे ?

(1) सर्वात मोठा
(2) सर्वात लहान
(3) अर्ध्या युरोपखंडा एवढा
(4) पूर्ण युरोपखंडा एवढा

**118.** हिंदुस्थानची प्रजा किती कोटी आहे ?

(1) 10 कोटी
(2) 20 कोटी
(3) 30 कोटी
(4) 40 कोटी

**119.** विलायतेच्या किती पट हा देश मोठा आहे ?

(1) विलायतेच्या नऊपट हा देश मोठा आहे
(2) विलायतेच्या दसपट हा देश मोठा आहे
(3) विलायतेच्या पाचपट हा देश मोठा आहे
(4) सातपट मोठा आहे

**120.** द्राविडी भाषेस काय म्हणतात ?

(1) तामळ किंवा आरवी
(2) आर्यभाषा किंवा प्राकृत
(3) संस्कृत किंवा कानडी
(4) गुजराथी किंवा फार्शी

खालील उताऱ्यातील प्रश्न क्र. **121 ते 125** ची उत्तरे द्या :

गांधींसारखे युगप्रवर्तक नेते कुणा महापुरुषाच्या छायेत वाढत नाहीत. स्वत:चे जीवन ते स्वत:च घडवतात. गांधींच्या व्यक्तिमत्त्वावरही कोणतीही परंपरा व संप्रदाय, धर्मग्रंथ किंवा गुरू यांची एकसुरी छाप दिसत नाही. अनेक ग्रंथ आणि संप्रदाय यांच्यामधून त्यांनी काही विचार, प्रेरणा व तत्त्वे आत्मसात केली आणि त्याप्रमाणे वर्तन करण्याची उमेद बाळगली. मात्र, केवळ एखादे पुस्तक वाचून त्यांनी आपले विचार घडविले असे झाले नाही. लौकिक व्यवहाराच्या कसोटीवर त्यांनी प्रत्येक नवी संकल्पना घासून पाहिली. ते म्हणतात, ''जे विचार मी प्रकट केले आहेत ते माझे आहेत आणि माझे नाहीत. ते माझे आहेत कारण की त्याप्रमाणे वर्तन करण्याची मला उमेद आहे, ते जणू माझ्या आत्म्यात घडलेले आहेत. ते माझेच नाहीत, कारण की तसे विचार मीच केले आहेत असे नाही. कित्येक पुस्तके वाचल्यानंतर ते बनले आहेत. मनाच्या आत खोल खोल जे मी पाहत होतो त्याला या पुस्तकांचा आधार मिळाला.''

असा आधार मिळाल्यामुळेच त्यांनी उत्स्फूर्तपणे स्वीकारलेल्या तत्त्वांवरील त्यांच्या श्रद्धेला बळकटी आली. त्यांचा आत्मविश्वास दुणावला. बालपणापासून गांधींनी सत्य हे जीवनातील सर्वश्रेष्ठ मूल्य म्हणून पत्करले होते. 'हे सत्य केवळ वाचेतील नसून

 

त्याला विचारांचा आधार होता. ते सापेक्ष होते तसे निरपेक्षही होते. असे निरपेक्ष (स्थलकालातीत) सत्य म्हणजे परमेश्वर' सत्याच्या रूपाने नेहमी परमेश्वराचाच साक्षात्कार होतो अशी त्यांची श्रद्धा होती. सत्यावरील निष्ठा हा त्यांच्या जीवनाचा मुख्य आधार होता. प्रत्येक माणसाच्या हृदयात परमेश्वराचे वास्तव असल्याने स्वत:च्या हृदयातच त्याला सत्याची प्रचीती येते. कितीही हालअपेष्टा सोसाव्या लागल्या, कितीही किंमत मोजावी लागली तरी स्वत:ला प्रतीत झालेल्या या सत्याला धरून आचारण करणे ही नीती होय. प्रत्येक माणसाच्या या नैतिक कर्तव्यालाच धर्म असे नाव आहे. स्वत:ला पटलेली ही नीतितत्त्वे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत उतरविण्यासाठी गांधी जन्मभर अविश्रांत धडपडले. म्हणूनच आपल्या आत्मचरित्राला त्यांनी 'सत्याचे प्रयोग' असे नाव दिले आहे.

**121.** महात्मा गांधींचे व्यक्तिमत्त्व घडले ते __________ मुळे.

(1) हिंदू धर्मग्रंथ अध्ययनाने
(2) अनेक धर्म-सांप्रदायिक विचारांच्या परिशीलनाने
(3) त्यांच्या सद्‌गुरूंच्या अनुग्रहाने
(4) पाश्चिमात्य जगत् भ्रमणामुळे

**122.** महात्मा गांधींना __________ म्हटले आहे.

(1) महात्मा
(2) राष्ट्रपिता
(3) महापुरुष
(4) युगप्रवर्तक

**123.** अयोग्य विधान निवडा.

(1) गांधींचे विचार अनेक पुस्तकांच्या वाचनाने बनले
(2) गांधींनी सत्य हे जीवनमूल्य स्वीकारले
(3) गांधींचे व्यक्तिमत्त्व हे महापुरुषांच्या छायेत विकसित झाले
(4) माणसांच्या नैतिक कर्तव्यालाच धर्म म्हणतात्

**124.** गांधींजींचे विचार हे 'त्यांचे आहेत आणि त्यांचे नाहीत' म्हणजे

(1) त्यांच्या विचाराविषयी ते साशंक आहेत
(2) ते विचाराप्रमाणे वागत् व त्या विचारांना अनेक पुस्तकात् आधार मिळाला
(3) ते विचार कुणाच्यातरी प्रेरणेने आहेत
(4) गांधींनी ते विचार सांगितले व ते ग्रंथातील आहेत

**125.** या उताऱ्याला योग्य शीर्षक द्या.

(1) बोले तैसा चाले
(2) ऐकावे जनाचे करावे मनाचे
(3) आम्हां घरी धन
(4) व्यक्ती तितक्या प्रकृती

